**वार्षिक योजना सन २००८-०९ अंतर्गत बिगर आदिवासी सर्वसाधारण योजनेत चार जिल्हयात ४३ पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-२ चा दर्जावाढ करुन त्याचे रुपांतर पशुवैद्यकीय दवाखाने श्रेणी-१ मध्ये करण्याच्या अनुषंगाने नवीन पदनिर्मिती आणि स्थान निश्चितीस मंजूरी प्रदान करणे बाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक व्हीएचडी - १००८ /प्र.क्र.४३४ / पदुम-४**
**मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२**
**दिनांक : १५ ऑक्टोबर , २०१०**

**वाचा :-** १) आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्रमांक-व्हीएचडी-२२५६/१०७३/२००८/ पसं-१२/पुणे-१, दि.१८ जून,२००८

२) वित्त विभाग, पृष्ठांकन क्रमांक पदनी - १०.०८ /प्र.क्र.९२/२००८/वित्तीय सुधारणा-१ दिनांक ८ डिसेंबर, २००८

३) आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, यांचे पत्र क्रमांक व्हीएचडी-२२५/५४१/२००९/ पसं-१२, पुणे-१, दिनांक २४ मार्च,२००९

४) कृषि पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,परिपत्रक क्रमांक पुरक -२०१०/प्र.क्र.४८/पदुम-१६, दिनांक २ ऑगस्ट,२०१०.

**प्रस्तावना :-**

भारतीय पशुवैद्यक परिषद अधिनियम १९८४, राज्यात दिनांक १ ऑगस्ट, १९९७ पासून लागू करण्यात आला आहे. त्यातील शिफारशींनुसार पशुवैद्यकीय सेवा हया पदवीधर पशुवैद्यकांमार्फतच देणे अपेक्षित आहे. त्यामुळे, राज्यात अस्तित्वात असलेले श्रेणी - २ चे पशुवैद्यकीय दवाखाने / पशुप्रथमोपचार केंद्रांचा टप्याटप्याने दर्जावाढ करुन त्यांचे रुपांतर श्रेणी -१ च्या पशुवैद्यकीय दवाखान्यांमध्ये करण्याचे शासनाचे धोरण आहे. पशुप्रथमोपचार केंद्रांचा दर्जावाढ केल्याने या संस्थेत पदवीधर पशुधन विकास अधिकारी, वर्ग-अ हे पद निर्माण होऊन त्यांच्या मार्फत शेतकरी / गोपालक यांना आधुनिक पशुवैद्यकीय सेवा उपलब्ध होऊ शकेल.

आयुक्त पशुसंवर्धन यांनी सन २००८-०९ मध्ये बिगर आदिवासी सर्वसाधारण योजनेत (जिल्हास्तरीय योजना) ठाणे, सोलापूर, औरंगाबाद आणि बीड या जिल्ह्यासाठी अनुक्रमे २, ३४, ३ व ४ श्रेणी -२ च्या एकूण ४३ पशुवैद्यकीय दवाखान्यांचा दर्जावाढ प्रस्तावित केला होता.

मा. उच्चस्तरीय सचिव समितीच्या दि. १९.११.२००८ रोजी पार पडलेल्या ५० व्या सभेत उपरोक्त प्रमाणे ४३ श्रेणी-२ च्या पशुवैद्यकीय दवाखान्यांचा दर्जावाढ करण्यासाठी आवश्यक असलेले ४३ पशुधन विकास अधिकारी वर्ग-अ ची नवीन पदे निर्मिती करण्यास मान्यता प्रदान केलेली आहे.

उपरोक्त प्रमाणे ४३ श्रेणी -२ च्या पशुवैद्यकीय दवाखान्यांचा दर्जावाढ करुन त्याचे रुपांतर श्रेणी -१ च्या पशुवैद्यकीय दवाखान्यांत करण्यासाठी विधानमंडळाच्या जुलै-२०१० च्या पावसाळी अधिवेशनात लाक्षणीक पुरक मागणी सादर करण्यात आली होती. त्यास विधी मंडळाची मान्यता मिळालेली आहे.

दर्जावाढ करावयाच्या श्रेणी -२ च्या पशुवैद्यकीय दवाखान्यांच्या ठिकाणी प्रति संस्था १ याप्रमाणे पशुधन विकास अधिकारी, वर्ग - अ हे नवीन पद निर्माण करणे व स्थाननिश्चिती करणे आवश्यक असल्याने, आता याद्वारे खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे .

**शासन निर्णय** :-

बिगर आदिवासी सर्वसाधारण योजनेत (जिल्हास्तरीय योजना) सन २०१०-११ मध्ये ४ जिल्हयांत श्रेणी-२ च्या ४३ पशुवैद्यकीय दवाखान्यांच्या दर्जावाढीसाठी खालीलप्रमाणे नविन पदनिर्मिती करण्यास याद्वारे, शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

**नविन पदनिर्मितीचा तपशील**

| अ. क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | एका दवाखान्यासाठी मंजूर पदे | ४३ दवाखान्यांसाठी मंजूर करण्यांत येत असलेली नवीन पदे |
|---|---|---|---|---|
| १ | पशुधन विकास अधिकारी, वर्ग-अ | रु.१५६००-३९१००/- + जी पी रु. ५४००/- | १ पद | ४३ पदे |
| | | एकूण | १ पद | ४३ पदे |

ठाणे, सोलापूर, औरंगाबाद व बीड या ४ जिल्हयांत श्रेणी -२ च्या ४३ पशुवैद्यकीय दवाखान्यांचा दर्जावाढ करुन त्यांचे रुपांतर श्रेणी-१ च्या पशुवैद्यकीय दवाखान्यांमध्ये करण्यासाठी खाली दर्शविल्याप्रमाणे स्थाननिश्चितीस व सदर दवाखाने कार्यान्वीत करण्यास याद्वारे शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

**श्रेणी-२ च्या पशुवैद्यकीय दवाखान्यांचा दर्जावाढ- स्थान निश्चितीचा तपशील**

| **अ. क्र.** | **जिल्हा** | **दर्जावाढ करण्यात येत असलेल्या श्रेणी -२ च्या पशुवैद्यकीय दवाखान्यांचे नाव** | **श्रेणी -१ मध्ये दर्जावाढ करणेसाठी स्थाननिश्चिती** |
|---|---|---|---|
| १ | ठाणे | १) पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-२ रायता, ता. कल्याण<br>२) पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-२ मांगरुळ, ता. अंबरनाथ | १) पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-१ रायता, ता. कल्याण<br>२) पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-१ मांगरुळ, ता. अंबरनाथ |
| २ | बीड | १) आधारभूत ग्राम उपकेंद्र, घाटनांदुर, ता. अंबेजोगाई<br>२) आधारभूत ग्राम उपकेंद्र, ममदापूर, ता. अंबेजोगाई<br>३)पशुवैद्येकीय दवाखाना श्रेणी-२ पिंपळनेर, ता. बीड<br>४) पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-२ डोंगर किन्ही, ता.बीड | १) पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-१ घाटनांदुर, ता. अंबेजोगाई<br>२) पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-१ ममदापूर, ता. अंबेजोगाई<br>३)पशुवैद्येकीय दवाखाना श्रेणी-१ पिंपळनेर, ता. बीड<br>४) पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-१ डोंगर किन्ही, ता.बीड |

| | | | |
|---|---|---|---|
| ३ | सोलापूर | १) पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-२ मार्डी, ता. उत्तर सोलापूर<br>२) पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-२ कळमन, ता. उत्तर सोलापूर<br>३) पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-२ भंडारकवठे, ता. दक्षिण सोलापूर<br>४) पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-२ होटगी, ता. दक्षिण सोलापूर<br>५) पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-२ उळे, ता. दक्षिण सोलापूर<br>६)पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-२ नरखेड ता. मोहोळ<br>७)पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-२ पेनुर, ता. मोहोळ<br>८)पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-२ वागदरी, ता. अक्कलकोट<br>९)पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-२ मेंदर्गी, ता. अक्कलकोट<br>१०)पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-२ करजगी, ता. अक्कलकोट<br>११)पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-२ रोपळे, ता. माढा<br>१२)पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-२ वाकाव, ता. माढा<br>१३)पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-२ उपळाई (खु.), ता. माढा<br>१४)पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-२ निमगाव, ता. माढा<br>१५)पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-२ उम्रड, ता. करमाळा<br>१६)पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-२ केत्तुर, ता. करमाळा<br>१७)पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-२ साडे, ता. करमाळा<br>१८)पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-२ पानगाव, ता. बार्शी<br>१९) पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-२ आगळगाव, ता. बार्शी | १) पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-१ मार्डी, ता. उत्तर सोलापूर<br>२) पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-१ कळमन, ता. उत्तर सोलापूर<br>३) पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-१ भंडारकवठे, ता. दक्षिण सोलापूर<br>४) पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-१ होटगी, ता. दक्षिण सोलापूर<br>५) पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-१ उळे, ता. दक्षिण सोलापूर<br>६)पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-१ नरखेड ता. मोहोळ<br>७)पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-१ पेनुर, ता. मोहोळ<br>८) पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-१ वागदरी, ता. अक्कलकोट<br>९) पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-१ मेंदर्गी, ता. अक्कलकोट<br>१०) पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-१ करजगी, ता. अक्कलकोट<br>११)पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-१ रोपळे, ता. माढा<br>१२)पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-१ वाकाव, ता. माढा<br>१३)पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-१ उपळाई (खु.), ता. माढा<br>१४)पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-१ निमगाव, ता. माढा<br>१५)पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-१ उम्रड, ता. करमाळा<br>१६)पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-१ केत्तुर, ता. करमाळा<br>१७)पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-१ साडे, ता. करमाळा<br>१८)पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-१ पानगाव, ता. बार्शी<br>१९)पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-१ आगळगाव, ता. बार्शी |

| | | | |
|---|---|---|---|
| | | २०)पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-२<br>चिखर्डे, ता.बार्शी<br>२१)पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-२<br>भाळवणी, ता. पंढरपूर<br>२२)पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-२<br>गादेगाव, ता. पंढरपूर<br>२३)पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-२<br>कासेगाव, ता. पंढरपूर<br>२४)पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-२<br>रोपळे, ता. पंढरपूर<br>२५)पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-२<br>खर्डी, ता. पंढरपूर<br>२६)पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-२<br>म्हाळूंग, ता. माळशिरस<br>२७)पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-२<br>शंकरनगर, ता. माळशिरस<br>२८)पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-२<br>निमगाव, ता. माळशिरस<br>२९)पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-२<br>बोराळे, ता. मंगळवेढा<br>३०)पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-२<br>हन्नुर, ता. मंगळवेढा<br>३१)पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-२<br>मरवडे, ता. मंगळवेढा<br>३२)पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-२<br>जवळा, ता. सांगोला<br>३३)पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-२<br>मेडसिंगी, ता. सांगोला<br>३४)पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-२<br>मांजरे, ता. सांगोला | २०)पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-१<br>चिखर्डे, ता.बार्शी<br>२१)पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-१<br>भाळवणी, ता. पंढरपूर<br>२२)पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-१<br>गादेगाव, ता. पंढरपूर<br>२३)पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-१<br>कासेगाव, ता. पंढरपूर<br>२४)पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-१<br>रोपळे, ता. पंढरपूर<br>२५)पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-१<br>खर्डी, ता. पंढरपूर<br>२६)पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-१<br>म्हाळूंग, ता. माळशिरस<br>२७)पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-१<br>शंकरनगर, ता. माळशिरस<br>२८)पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-१<br>निमगाव, ता. माळशिरस<br>२९)पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-१<br>बोराळे, ता. मंगळवेढा<br>३०)पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-१<br>हन्नुर, ता. मंगळवेढा<br>३१)पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-१<br>मरवडे, ता. मंगळवेढा<br>३२)पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-१<br>जवळा, ता. सांगोला<br>३३)पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-१<br>मेडसिंगी, ता. सांगोला<br>३४)पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-१<br>मांजरे, ता. सांगोला |
| ४ | औरंगाबाद | १. पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-२<br>पळशी, ता. सिल्लोड<br>२. पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-२<br>लाडसावंगी, ता. औरंगाबाद<br>३. पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-२<br>शेंदूरवादा, ता. गंगापूर | १. पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-१<br>पळशी, ता. सिल्लोड<br>२. पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-१<br>लाडसावंगी, ता. औरंगाबाद<br>३. पशुवैद्यकीय दवाखाना श्रेणी-१<br>शेंदूरवादा, ता. गंगापूर |

प्रस्तुत नवीन पदनिर्मितीच्या वेतन व भत्त्यावरील खर्च राज्यस्तरीय योजनेतून खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

**२४०३, पशुसंवर्धन,**
**१०१- पशुवैद्यकीय सेवा व पशुआरोग्य**
**(०८) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना**
**(०८)(३६) पशुवैद्यकीय मदत केंद्रांचा व आधारभूत ग्राम उपकेंद्रांचा दर्जा वाढविणे.**
**(संकेतांक क्र.२४०३ २४४ ८)**

वेतन व भत्त्यावरील पुढील कालावधीकरिता राज्यस्तरीय योजनेतून निधी प्रस्तावित करण्यांत यावा.

ज्या जिल्हयांकडे श्रेणी-२ च्या पशुवैद्यकीय दवाखान्यांचा दर्जावाढ करुन त्याचे रुपांतर श्रेणी-१ च्या पशुवैद्यकीय दवाखान्यात करुन ते कार्यान्वीत करण्यास वेतनोत्तर बाबीसाठी चालू आर्थिक वर्षात पुरेसा निधी उपलब्ध नसल्यास तो जिल्हा नियोजन समितीकडून पुनर्विनियोजनाद्वारे उपलब्ध करुन घेण्यात यावा.

सदरचे दवाखाने स्थापन झाल्यापासून पुढील ५ वर्षाच्या कालावधीसाठी वेतन व भत्तेसाठी वर नमूद केलेल्या लेखा शिर्षाखाली राज्यस्तरीय योजनेतून निधी प्रस्तावित करण्यात यावा व वेतनोत्तर बाबीसाठी बिगर आदिवासी योजनेंतर्गत निधीची मागणी संबंधित जिल्ह्यांनी त्यांच्या जिल्हा नियोजन समितीकडे करावी.

**नवनिर्मित पशुधन विकास अधिकाऱ्यांच्या पदांबाबत, महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडे पाठवावयाच्या मागणीपत्राचा प्रस्ताव आयुक्त पशुसंवर्धन यांनी तात्काळ शासनास सादर करावा.**

प्रस्तुत शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१५५/१४३२, दि.५ जुलै,२००८ आणि वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४२९/२००८/व्यय-२, दि.१४ जुलै,२००८ तसेच वित्त विभाग पृष्ठांकन क्र.पदनि-१०.०८/प्र.क्र.९२/२००८/वित्तीय सुधारणा-१, दि.८ डिसेंबर,२००८ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या मा.उच्चस्तरीय सचिव समितीच्या बुधवार, दि.१९ नोव्हेंबर,२००८ रोजी झालेल्या ५० व्या बैठकीच्या कार्यवृत्तानुसार उक्त नवीन पदनिर्मितीस देण्यात आलेल्या मंजुरी अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध **असून त्याचा संगणक सांकेतांक २०१०१०१५१८३७२७००१** आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

सही/-
**(प्रणाली चिटणीस),**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
मा.मंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव,
मा.राज्यमंत्री (पशुसंवर्धन व दुग्धव्यवसाय) यांचे खाजगी सचिव,
आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती),
जिल्हाधिकारी, ठाणे / सोलापूर / औरंगाबाद / बीड,
प्रादेशिक पशुसंवर्धन सह आयुक्त (सर्व),
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षण), मुंबई / नागपूर,
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,ठाणे / सोलापूर / औरंगाबाद / बीड,
जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त, ठाणे / सोलापूर / औरंगाबाद / बीड,
जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद,ठाणे / सोलापूर / औरंगाबाद / बीड,
जिल्हा कोषागार अधिकारी,ठाणे / सोलापूर / औरंगाबाद / बीड,
नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
वित्त विभाग (व्यय-२/वित्तीय सुधारणा-१/अर्थसंकल्प-१४), मंत्रालय, मुंबई - ३२.
अवर सचिव (पदुम-३/१६), कक्ष अधिकारी (पदुम-१/१-अ), कृषि व पदुम विभाग,मंत्रालय, मुंबई - ३२.
निवड नस्ती.